बीड येथील जिल्हा व सत्र न्यायालयाच्या नवीन इमारतीस आवाज विरहीत जनरेटर बसविणेबाबत ...................................

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१७/प्र.क्र.२८२/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ५ फेब्रुवारी, २०१९

**वाचा -**

१ प्रबंधक B(W) शाखा, मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक B(W)/६००५ of १९६९/२४१६/२९६८६, दिनांक १५.०९.२०१७

२ जिल्हा व सत्र न्यायालय बीड यांचे पत्र क्रमांक बांवि/४५४९/२०१७, दिनांक २३.०५.२०१७ व क्रमांक बांवि/१८७३/२०१८, दिनांक ०५.०३.२०१८

**प्रस्तावना -**

जिल्हा व सत्र न्यायालय बीड येथील नवीन इमारतीमधील विद्युत पुरवठा अनेक वेळा खंडीत होतो. त्यामुळे न्यायालयातील कामकाजात अडथळा निर्माण होत असल्याने, न्यायालयीन कामकाज सुरळीत चालण्याच्या दृष्टीने इमारतीस विद्युत पुरवठा करण्यासाठी योग्य त्या क्षमतेचे आवाज विरहीत (Noiseless Generator) जनरेटर बसविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. (१) येथील पत्रान्वये प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी केली आहे. कामाचे सविस्तर अंदाजपत्रक सन २०१५-१६ च्या दरसूचीवर उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग बीड यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग औरंगाबाद तसेच, प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश बीड यांनी साक्षांकीत केले आहे. त्या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय बीड येथील नवीन इमारतीसाठी आवाज विरहीत जनरेटर बसविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जिल्हा व सत्र न्यायालय बीड येथील नवीन इमारतीमध्ये आवाज विरहीत (Noiseless Generator) जनरेटर बसविण्यासाठी रुपये ५७,८७,६९२/- (रुपये सत्तावन्न लक्ष सत्त्याऐंशी हजार सहाशे ब्याण्णव फक्त) इतक्या खर्चाच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्याचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | कामाचा तपशील | अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १ | Providing Diesel Generator Set ५०० KVA for newly constructed District and Sessions Court Building Beed, District Beed | ५०,७६,९२३ |
| | Add ४% Contingency | २,०३,०७७ |
| | Add २ & T&P | १,०१,५३८ |
| | Add ८% Centage Charges | ४,०६,१५४ |
| | एकूण<br>अक्षरी रुपये सत्तावन्न लक्ष सत्त्याऐंशी हजार सहाशे ब्याण्णव फक्त | ५७,८७,६९२ |

२. यासाठी होणारा खर्च " मागणी क्रमांक जे-१, २०१४, न्यायदान, (००) १०५- दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश, (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश, (२०१४ ०१७२) दत्तमत, २७ लहान बांधकामे या उद्दीष्टाखालील तरतुदीतून करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८१३/इमा-२, दिनांक १६.०१.२०१८ अन्वये व त्या विभागाच्या सहमतीने, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३२६/२०१८/व्यय-५ , दिनांक ३१.१२.२०१८ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०५१५०९३३१९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2019.02.05 15:11:23 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरीक्षणे-१/२), मा.उच्च न्यायालय मुंबई
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, बीड,

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता १/२), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,

४. महालेखापाल (लेखा परीक्षा १/२), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर

५. जिल्हा कोषागार अधिकारी बीड,

६. उप जिल्हा कोषागार अधिकारी बीड,

७. वित्त विभाग (व्यय-५ / विनियम), मंत्रालय, मुंबई

८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,

९. विधि व न्याय विभाग (का.१३/२३), मंत्रालय, मुंबई,

१०.निवडनस्ती (का.१२)